**१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेंतर्गत नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण ०९१६/६८६/प्र.क्र.११७/कार्या.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा :</u> १.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. क्र.B(W)६०४९/२०१०/१०७२/१३६८८, दि.१६/४/२०१९
२. नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. डी/देखभाल विभाग/पीजे/८८४/२०१९, दि.२८/३/२०१९
३. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/कार्या.९, दि.१०/११/२०१६.
४. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.२०/२/२०२०

**<u>प्रस्तावना:</u>**

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या “न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण” (Strengthening the Justice) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण या घटकासाठी ५ वर्षाच्या कालावधीकरीता रु.२२८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दि.९/३/२०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीच्या दि.२८/३/२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडुन प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली. या बैठकीचे इतिवृत्त दि.१६/०५/२०१६ रोजी निर्गमित करण्यात आले. त्यामध्ये न्यायालयाच्या नुतनीकरणाच्या ज्या प्रस्तावाची किंमत रु.५० लक्षपेक्षा अधिक असेल असे प्रस्ताव मान्यतेसाठी उच्चस्तरीय संनियंत्रण समितीसमोर सादर करण्याचे ठरले. मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या तपासणीअंती ज्या प्रस्तावाची किंमत रु.५० लक्षपेक्षा अधिक आहे, असे ७ प्रस्ताव उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या मान्यतेसाठी सादर केले असता त्यावर चर्चा होऊन सदर प्रस्तावास उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या दि.१६/१/२०२० रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. तसेच मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या मान्यतेने प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभाग म्हणून विधि व न्याय विभागास दि.२०/२/२०२०रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आले आहेत.

सदर ७ प्रस्तावात नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती / नुतनीकरणाचा प्रस्ताव समावेश करण्यात आला आहे. १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेअंतर्गत नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीकरिता रु.८७,०५,८७०/- इतक्या रकमेस दि.९/३/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. तदनंतर उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये सन २०१८-२०१९ च्या दरसूचीवर आधारीत नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती / नुतनीकरणाचा रु.६,४६,४९४/-

इतक्या रकमेचा प्रस्ताव मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून शासनास प्राप्त झाला आहे. त्याबाबतचे अंदाजपत्रक संबंधित उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मुंबई यांनी तयार केले असून संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई तसेच प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांनी साक्षांकित केले आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार सदर कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या अंतर्गत नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती /नुतनीकरणासाठी येणाऱ्या रुपये ६,४६,४९४/- (अक्षरी रुपये सहा लाख सेहचाळीस हजार चारशे चौऱ्याण्णव फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती/ नुतनीकरणाच्या कामाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | मा.उच्च न्यायालयाच्या पत्राचा दिनांक | न्यायालयीन इमारत | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकाची किंमत (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | १६/४/२०१९ | नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई | Providing one way glasses to the witness boxes at Court room nos.15,18,29,33,39 & 40 | ६,४६,४९४ |
| **एकूण** | | | | **६,४६,४९४** |

३. नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती/ नुतनीकरणासाठी येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण, (११) (०१) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८) या लेखाशीर्षाखालील मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी उपरोक्त कामे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या Dedicated Cell ने निश्चित केलेल्या कामामधीलच असल्याची खातरजमा करण्याची तसेच सदर अंदाजपत्रक सक्षम अधिकाऱ्यांकडून साक्षांकित करण्याची जबाबदारी प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांची राहील. प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्याकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.२४७/१९/इमा.२, दि.४/६/२०१९ अन्वये तसेच शासन निर्णय विधि व न्याय विभाग,क्र.चौविआ१२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.२०/२/२०२०अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२४१५२७२५९११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.02.24 15:33:18 +05'30'

(सं.सं.नवगिरे)
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
३. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
८. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
१०. विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई,
११. निवडनस्ती (कार्यासन ११)